राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास यासंदर्भात प्राप्त प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत. (कोल्हापूर महानगरपालिका)

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. औपासू- २०१८/प्र.क्र.२०१/उद्योग-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०१ जानेवारी, २०२०

वाचा : १) शासन निर्णय क्र. आयआयआय पॉलिसी २०१०/प्र.क्र.७६८/उद्योग-२, दि.२२/०२/२०१३.
२) शासन निर्णय क्र.औपासू २०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५/०२/२०१४.
३) शासन शुध्दीपत्रक क्र.औपासू-२०१६/प्र.क्र.२१९/उद्योग-२, दि.२०/१२/२०१६.
४) दि.०७/०३/२०१९ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या पाचव्या बैठकीचे इतिवृत्त दि.२७/०३/२०१९.
५) शासन निर्णय क्र. औपासू-२०१८प्र.क्र २०१/उद्योग-२, दि. २८/०३/२०१९.
६) शासन पत्र क्र. औपासू-२०१८/प्र.क्र. २०१/उद्योग-२, दि. १४/१०/२०१९.
७) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ औ.पा.सु/ उद्योग-२/२०१९/अे-१५८७, दि. ११/१२/२०१९.

**शासन निर्णय :-**

राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मीती व विकास या योजनेअंतर्गत कोल्हापूर महानगरपालिका या कार्यान्वयन यंत्रणेने प्रस्ताव सादर केला आहे.

२ मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील महाराष्ट्र औद्योगिक पायाभूत सुविधा निर्मिती व विकास समितीने दिनांक ०७/०३/२०१९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये उद्योग समूहाच्या औद्योगिक सुविधा विषयक कामांना मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांनी संदर्भाधीन क्रमांक ७ येथील पत्रान्वये सादर केलेल्या खालील विवरणपत्रात नमूद प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर प्रकल्पासाठी कोल्हापूर महानगरपालिका ही कार्यान्वयन यंत्रणा आहे.

(रुपये लक्ष)

| अ.क्र. | औद्योगिक वसाहत | मुळ प्रस्तावाची किंमत | प्रशासकीय मंजूरी |
|---|---|---|---|
| १. | कोल्हापूर शहरातील उद्यमनगर, वाय.पी.पोवार नगर व पांजरपोळ औद्योगिक क्षेत्रातील कामे.<br>➢ शिवाजीनगर उद्यमनगर इंडस्ट्रीयल एरियामधील अंतर्गत रस्ते व ९ फूट गटर्स करणे.<br>➢ वाय.पी.पोवार नगर इंडस्ट्रीयल एरियामधील अंतर्गत रस्ते व ९ फूट गटर्स करणे.<br>➢ पांजरपोळ औद्योगिक क्षेत्र, कोल्हापूर अंतर्गत रस्ते व ९ फूट गटर्स करणे. | ४७६.०० | ३५७.०० (७५%) |

३. सदर प्रशासकीय मान्यता ही सुकाणू समितीच्या दि. ०७/०३/२०१९ रोजी झालेल्या पाचव्या बैठकीमध्ये प्राप्त मंजूरी व सदरहू बैठकीतील सूचनांनुसार अवलंबावयाच्या कार्यपध्दतीनुसार तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.औपासू-२०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दि.२५/०२/२०१४ मधील परि. ६ नुसार देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन देण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग १ ते ५ प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारातील सुधारणा संदर्भात वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम-भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ मधील महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका अंतर्गत नियम २७(२) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२००१०११०१७२२४२१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2020.01.01 16:04:40 +05'30'

**( संजय देगांवकर )**
सह सचिव (उद्योग), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), नागपूर.
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई.
५) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-४०० ०३२.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
८) मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
९) आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका, कोल्हापूर.
१०) सर्व औद्योगिक वसाहती (उपरोक्त नमूद) (मार्फत विकास आयुक्त, उद्योग).
११) मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१२) वित्त विभाग (कार्यासन अर्थसंकल्प-१४/व्यय-१६) मंत्रालय, मुंबई.
१३) नियोजन विभाग, (कार्यासन-१४६१), मंत्रालय, मुंबई.
१४) कक्ष अधिकारी (प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) निवडनस्ती (उद्योग-२).